राज्यातील तेंदू संकलन धोरण ठरविण्याबाबत...

**महराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय : तेंदूआ-२०२२/प्र.क्र.१३८/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२३

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एमएफपी-२१-०४/प्र. क्र.६७/फ-१, दिनांक २८.०२.२००६
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एमएफपी-२१-०४/प्र. क्र.६७/फ-१, दिनांक ०१.११.२००७

**प्रस्तावना :-**

राज्यात महाराष्ट्र वनोपज (व्यापार विनियमन) अधिनियम, १९६९ व त्याखालील नियमांनुसार तेंदू पानांची विल्हेवाट लावली जाते. दिनांक २८.०२.२००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील तेंदू संकलन धोरण ठरविण्यात आले आहे. त्यानुसार सुधारीत एकमुस्त पध्दतीने तेंदू संकलनान्वये जमा होणाऱ्या उत्पन्नातून तेंदू पाने संकलनावरील खर्च वजा जाता, उर्वरित निव्वळ नफा हा तेंदू पाने संकलन करणाऱ्या मजुरांना त्यांनी संकलन केलेल्या पानांच्या प्रमाणात "प्रोत्साहनार्थ मजूरी" म्हणून वाटप करण्याची तरतुद आहे. तसेच शासन निर्णय दिनांक ०१.११.२००७ मधील तरतुदीनुसार ज्या तेंदू हंगामातील प्रोत्साहनार्थ मजुरी अदा करावयाची आहे त्या हंगामासाठी प्राप्त स्वामित्व शुल्कातून मागील आर्थिक वर्षात तेंदू संकलनाकरीता झालेला खर्च अधिक १२% याप्रमाणे वजा करुन तेंदू हंगामासाठी प्रोत्साहनार्थ मजुरी काढण्यात येते. सदर धोरणानुसार सन २००६ ते २०२१ तेंदू हंगामापर्यंत तेंदूपाने संकलनान्वये प्राप्त उत्पन्नातून संकलनावरील खर्च वजा जाता उर्वरीत निव्वळ नफा तेंदू पाने संकलन करणाऱ्या मजूरांना, त्यांनी संकलन केलेल्या प्रमाणात प्रोत्साहनार्थ मजुरी म्हणून वाटप करण्यात येत होता.

तथापि, तेंदू संकलनातून प्राप्त होणा-या स्वामित्व शुल्कामधून तेंदू लेखाशिर्षातर्गत होणारा असमर्थनीय असा खर्च वजा करणे तसेच एक वर्ष उशिराने संकलनकर्त्यांना प्रोत्साहनात्मक मजुरी देणे या नकारात्मक बाबींवर तोडगा काढणे आवश्यक असल्याने दिनांक ०१.११.२००७ च्या तेंदू संकलन धोरणात आवश्यक बदल करून उपजिविकेची मर्यादित साधने असलेल्या तेंदू संकलनकर्त्या मजुरांच्या उत्पन्नात भर पडावी ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये तेंदू संकलनान्वये जमा होणाऱ्या स्वामित्व शुल्काची रक्कम तेंदू पाने संकलन करणाऱ्या मजुरांना त्यांनी संकलन केलेल्या पानांच्या प्रमाणात प्रोत्साहनात्मक मजुरी म्हणून वाटप करण्यासाठी महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक एमएफपी-२१-०४/प्र.क्र.६७/फ-१, दिनांक ०१.११.२००७ मधील नमूद कार्यपद्धतीतील मुद्यांमध्ये खालीलप्रमाणे बदल करून ती अंमलात आणावी.

**मुद्दा क्र.१: स्वामित्व शुल्काची रक्कम तेंदू संकलन कर्त्यांना प्रोत्साहनार्थ मजूरी म्हणून वाटप करण्याची पद्धत:-**

सन २०२२ च्या तेंदू हंगामापासून पुढे तेंदूपाने संकलनाद्वारे जमा होणारी संपूर्ण स्वामित्व शुल्काची रक्कम कोणत्याही प्रकारची वजाती न करता संबंधित तेंदू पाने संकलन करणा-या मजुरांना त्यांनी संकलन केलेल्या प्रमाणात प्रोत्साहनार्थ मजुरी म्हणून त्यांच्या बँक खात्याद्वारे वाटप करण्यात यावी.

**मुद्दा क्र.२: संकलनकर्त्यास द्यावयाची प्रोत्साहनार्थ मजूरी परिगणित करण्याचे सुत्र:-**

(i) राज्यस्तरावर प्राप्त होणा-या एकूण स्वामित्व शुल्कातून कोणताही खर्च वजा न करता संपूर्ण स्वामित्व शुल्क प्रोत्साहनार्थ मजुरी वाटपासाठी उपलब्ध समजावे.

(ii) वनविभागाकडे प्रत्येक घटक / घटक समुहाकरीता प्राप्त झालेले एकूण स्वामित्व शुल्क संबंधित घटक / घटक समुहाकरीता प्रोत्साहनार्थ मजुरीची रक्कम म्हणून अदा करण्यासाठी उपलब्ध असेल.

(iii) तेंदू घटक / घटक समुहाकरीता प्राप्त होणा-या एकुण स्वामित्व शुल्काला त्या घटक/घटक समुहातून एकुण प्रत्यक्षात संकलन केलेल्या प्रमाण गोणीने भागुन प्रोत्साहनार्थ मजूरीचा त्या घटक / घटक समुहाकरीता प्रति प्रमाण गोणी दर काढण्यात यावा आणि त्या घटक / घटक समुहातील प्रत्येक तेंदू संकलनकर्त्यासाठी या दराचा वापर करुन त्यांनी संकलीत केलेल्या प्रमाण गोणीस गुणुन येणारी रक्कम प्रोत्साहनार्थ मजुरी म्हणून त्या संकलनकर्त्यास वाटप करण्यात यावी.

**मुद्दा क्र.३: प्रोत्साहनार्थ मजुरी संकलनकर्त्यास वाटप केल्यानंतर रक्कम शिल्लक रहात असल्यास योग्य लेखाशिर्षात भरपाई (Recoup) करणे:-**

स्वामित्व शुल्काची एकूण रक्कम प्रोत्साहनार्थ मजुरी म्हणून संकलनकर्त्यांस वाटप केल्यानंतर काही अपरिहार्य कारणास्तव काही रक्कम शिल्लक रहात असल्यास सदर स्वामित्व शुल्काची रक्कम महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ अन्वये विहीत फॉर्म एमटीआर-६ चा वापर करुन खालील लेखा शिर्षात महसूल म्हणून जमा करावी.

*प्रधान लेखा शीर्ष:- ०४०६ वनीकरण व वन्यजीवन (महसूली जमा)*

*गौण शीर्ष:- १०१ इमारती लाकूड व इतर गौण वनोत्पादने यांची विक्री*

*उप शीर्ष:- (एक) संस्करण पथकाखेरीज अन्य शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (०४०६ ००११) तेंदूपाने रॉयल्टी*

**मुद्दा क्र.५:** वन विभागाकडे जमा करण्यात येणारी स्वामित्व शुल्काची एकूण रक्कम संबंधित स्विय प्रपंची लेख्यात (PLA) जमा झाल्यानंतर १ महिन्याच्या आत म्हणजेच संबंधित तेंदू हंगामाच्या माहे-डिसेंबर अखेरपर्यंत संबंधित संकलनकर्त्या मजुरांना प्रोत्साहनार्थ मजुरी म्हणून Direct Benefit Transfer Scheme (DBTS) व्दारे वितरण करण्यात यावे. तसेच संकलनकर्ते मजुरांच्या नावासह प्रोत्साहनार्थ मजुरी रक्कम वाटपाबाबतची यादी वनविभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

**मुद्दा क्र.६:** सन २०२२ तेंदू हंगाम पासून गटविमा योजने ऐवजी केंद्र शासनाची 'आम आदमी विमा योजना' लागू करण्यात यावी ही बाब वगळण्यात येत आहे.

**मुद्दा क्र.७.४:** ज्यांचे नावे स्वीय प्रपंची लेखा आहे, त्यांचे नावे धनादेश पुस्तक संबंधित कोषागार अधिकारी यांचेकडून प्राप्त करुन घेण्यात यावे व त्यातुन प्रोत्साहनार्थ मजूरी चे वाटप संबंधित मजुरांच्या बँक खात्यात इलेक्ट्रॉनिक पध्दतीने थेट जमा करण्यात यावे. प्रोत्साहनार्थ मजूरी ही बाब वगळता तेंदू संकलनाच्या कुठल्याही प्रकारच्या खर्चाकरीता उक्त स्वीय प्रपंची लेखा आणि त्या अंतर्गत प्राप्त करुन घेतलेले धनादेश पुस्तक यांचा वापर करु नये.

उपरोक्त मुद्दयांमधील सुधारणा वगळता शासन निर्णय १ नोव्हेंबर २००७ मधील तेंदू संकलन धोरणाबाबत नमूद इतर कार्यपद्धती जशाच्या-तश्या लागू राहतील.

सदर शासन निर्णय मंत्रिमंडळाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१५१५१७३०५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=cd9b7c852f06815dc15baee9beaa952cb59250169fcb3d489150789e0cc31ca6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6025E577A0EE54FAED5D6081093A5E1F8E2B15125A14DDE66E1EA3AFA9BC2CF5, cn=PINGALE BHANUDAS NARAYAN
Date: 2023.02.15 15:36:41 +05'30'

**(भा. ना. पिंगळे)**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षण/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती (कार्यासन-फ-९), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.